महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक / पोलीस हवालदार / पोलीस नाईक व पोलीस शिपाई यांच्याकरिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा - २००८.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक -पीएसबी-०३०८/प्र.क्र.५९४/पोल-५(अ),**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ६ नोव्हेंबर, २००९.**

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील **पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा-२००८** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **रविवार दिनांक ३ जानेवारी, २०१०** रोजी मुंबईसह सात परीक्षा केंद्रावर घेण्यात येणार आहे. परीक्षेचा कार्यक्रम, आरक्षित पदांचा व निवडपध्दतीचा तपशील, सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मध्ये नमूद केला आहे. तसेच **पूर्व परीक्षेचा अभ्यासक्रम परिशिष्ट "ब"** मध्ये नमूद केला आहे. प्रस्तुत शासन परिपत्रक सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या (रजेवर / प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह) निदर्शनांस आणावे.

हे शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २००९११०६१९४०२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( सदानंद जाधव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

...............

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) अपर पोलीस महासंचालक, (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).

## परिशिष्ट - अ

महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहायक पोलीस उप-निरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई, यांच्याकरिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा - महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्याचा निर्णय, शासन निर्णय, क्रमांक-पीएसबी-०३९०/सीआर-४०८/(२)/पोल-५अ, दिनांक ८ फेब्रुवारी, १९९६ अन्वये लागू करण्यात आला. त्यानुसार **पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा-२००८** खाली नमूद केल्याप्रमाणे एकूण **चार टप्प्यात** घेण्यात येणार असून, त्यापैकी पहिल्या टप्प्यातील **पूर्व परीक्षा दिनांक ३ जानेवारी, २०१०** रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येईल.

**(१) पूर्व परीक्षा -२०० गुण**

**(२) मुख्य परीक्षा - ३०० गुण**

**(३) शारीरिक चाचणी - १०० गुण**

**(४) मौखिक व व्यक्तीमत्व चाचणी - ५० गुण**

**२. उपलब्ध पदसंख्या व आरक्षण :-**

| अ.क्र. | वर्गवारी | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अमागास | १७२ |
| २ | अनुसूचित जाती | ३७ |
| ३ | अनुसूचित जमाती | २६ |
| ४ | विमुक्त जाती (अ) | ५ |
| ५ | भटक्या जमाती (ब) | ६ |
| ६ | भटक्या जमाती (क) | ७ |
| ७ | भटक्या जमाती (ड) | १२ |
| ८ | विशेष मागास प्रवर्ग | ५ |
| ९ | इतर मागास वर्ग | -- |
| | **एकूण -** | २७० |

**२.१ उपरोक्त पदसंख्येत व आरक्षणामध्ये बदल होण्याची शक्यता आहे.**

**३. पात्रता विषयक अटी :-**

**३.१ शैक्षणिक अर्हतेसह अनुभव :-** प्रस्तुत परीक्षेकरिता उमेदवारांची सहायक पोलीस उपनिरीक्षक / पोलीस हवालदार / पोलीस नाईक व पोलीस शिपाई या पदावर नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून **दिनांक १ जानेवारी, २००९** रोजी खालीलप्रमाणे किमान नियमित सेवा पूर्ण होणे आवश्यक आहे.

**१)** मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेचा **पदवीधर** असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत - **४ वर्ष**.

**२)** महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची **एच.एस.सी.** परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एच.एस.सी. च्या समतूल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत- **५ वर्ष**.

**३) एस.एस.सी.** परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी. च्या समतुल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत - **६ वर्षे**.

**३.२ वयोमर्यादा :-** उमेदवाराचे वय **दिनांक १ जानेवारी, २००९** रोजी गणले जाईल आणि वयोमर्यादा अमागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ३५ वर्षांपर्यत व मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ४० वर्षांपर्यंत राहील.

**३.३ जे उमेदवार दिनांक १ जानेवारी, १९९१ नंतर मर्यादित विभागीय परीक्षेस बसण्यास पात्र होते तथापि, ज्यांना सन १९९८ आणि सन २००२ च्या मर्यादित विभागीय परीक्षांना वयोमर्यादेच्या कारणास्तव बसण्याची परवानगी देण्यात आली नव्हती, अशा उमेदवारांना पुढे तीन सलग होणा-या परीक्षांना बसण्याच्या तीन संधी देण्यात आल्या आहेत. मात्र जे उमेदवार सन २००६ व २००७ करिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या परीक्षेस बसले नाहीत अशा उमेदवारांच्या बाबतीत त्यांनी ती संधी गमावली असे समजण्यात येऊन**

**त्यांना आता केवळ एकच संधी उपलब्ध होईल. तसेच जे उमेदवार परीक्षेस बसले होते, त्यांनाही आता केवळ एकच संधी उपलब्ध होईल.**

**३.४** एखाद्या वर्षी परीक्षा न झाल्यामुळे कमाल वयोमर्यादा पूर्ण होण्यापूर्वी परीक्षेच्या सलग ३ संधी मिळाल्या नसतील अशा उमेदवारांना कमाल वयोमर्यादेनंतर सलग होणा-या परीक्षेस बसण्याच्या यथास्थिती उर्वरीत संधी देण्यात येतील. कोणत्याही परिस्थितीत या सलग संधी ३ पेक्षा जास्त असणार नाहीत.

**४. अर्ज सादर करण्याबाबत :-**

**४.१** आयोगाने विहित केलेले अर्ज मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेच्या माहितीपुस्तिकेसह महाराष्ट्र राज्यातील खालील पोस्ट कार्यालयात पोस्ट कार्यालयाच्या कार्यालयीन वेळेत प्रत्येकी **रु. १००/- (रु शंभर फक्त)** रोख भरून उपलबध होतील. प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज करण्यासाठी "मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेकरिता अर्ज व माहितीपुस्तिका" असे नमूद केलेली (हिरव्या रंगाच्या मुखपृष्ठाची) माहितीपुस्तिकाच विकत घ्यावी. कोणत्याही परिस्थितीत आयोगाच्या कार्यालयातून अर्ज पुरविण्यात येणार नाहीत. तसेच पोस्टाने अर्जांची मागणी केल्यास अर्ज पुरविला जाणार नाही. परिपूर्ण भरलेले अर्ज छायाचित्र व विहित परीक्षा शुल्क रोख भरुन **दि. २३ नोव्हेंबर, २००९ पर्यंत सादर करणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत अर्ज स्वीकारण्याची कालमर्यादा (दि. २३ नोव्हेंबर, २००९) काटेकोरपणे पाळली जाईल.**

| अ.क्र. | जिल्हा | पोस्ट कार्यालये | अ.क्र. | जिल्हा | पोस्ट कार्यालये |
|---|---|---|---|---|---|
| १ | **अहमदनगर** | अहमदनगर- प्रधान डाकघर | २ | **अकोला** | अकोला- प्रधान डाकघर |
| ३ | **अमरावती** | अमरावती - प्रधान डाकघर | ४ | **औरंगाबाद** | औरंगाबाद-प्रधान डाकघर |
| ५ | **बीड** | बीड - प्रधान डाकघर | ६ | **भंडारा** | भंडारा - प्रधान डाकघर |
| ७ | **बुलडाणा** | बुलडाणा - प्रधान डाकघर | ८ | **चंद्रपूर** | चंद्रपूर - प्रधान डाकघर |
| ९ | **धुळे** | धुळे - प्रधान डाकघर | १० | **गडचिरोली** | गडचिरोली |
| ११ | **गोंदिया** | गोंदिया - प्रधान डाकघर | १२ | **हिंगोली** | हिंगोली |
| १३ | **जालना** | जालना - प्रधान डाकघर | १४ | **जळगाव** | जळगाव - प्रधान डाकघर |
| १५ | **कोल्हापूर** | कोल्हापूर शहर - प्रधान डाकघर | १६ | **लातूर** | लातूर- प्रधान डाकघर |
| १७ | **नंदूरबार** | नंदूरबार | १८ | **नागपूर** | नागपूर- जी. पी. ओ. |
| १९ | **नांदेड** | नांदेड -प्रधान डाकघर | २० | **नाशिक** | नाशिक- प्रधान डाकघर |
| २१ | **उस्मानाबाद** | उस्मानाबाबद - प्रधान डाकघर | २२ | **परभणी** | परभणी - प्रधान डाकघर |
| २३ | **पुणे** | पुणे शहर - प्रधान डाकघर | २४ | **रायगड** | अलिबाग- प्रधान डाकघर |
| २५ | **रत्नागिरी** | रत्नागिरी - प्रधान डाकघर<br>चिपळूण - प्रधान डाकघर | २६ | **सांगली** | सांगली - प्रधान डाकघर<br>मिरज - प्रधान डाकघर |
| २७ | **सातारा** | सातारा - प्रधान डाकघर,<br>कराड - प्रधान डाकघर | २८ | **सिंधुदुर्ग** | मालवण - प्रधान डाकघर<br>सावंतवाडी -प्रधान डाकघर |
| २९ | **सोलापूर** | सोलापूर - प्रधान डाकघर<br>पंढरपूर - प्रधान डाकघर | ३० | **ठाणे** | ठाणे - प्रधान डाकघर<br>कल्याण - प्रधान डाकघर<br>पालघर - प्रधान डाकघर |
| ३१ | **वर्धा** | वर्धा - प्रधान डाकघर | ३२ | **वाशिम** | वाशिम |
| ३३ | **यवतमाळ** | यवतमाळ - प्रधान डाकघर | ३४ | **नवी मुंबई** | कोकण भवन पोस्ट ऑफिस, विभागीय आयुक्त कार्यालय, सिडको भवन समोर, सीबीडी बेलापूर, ४०० ६१४. |
| ३५ | **मुंबई** | १) दादर प्रधान डाकघर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मार्ग, मुंबई - ४०० ०१४.<br>२) अंधेरी प्रधान डाकघर, डी. एन.नगर, अंधेरी, मुंबई - ४०० ०५३.<br>३) स्टॉक एक्स्चेंज पोस्ट ऑफिस, फोर्ट मेन्शन, हमाम स्ट्रीट, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.<br>४) मुंबई , जी. पी. ओ. मुंबई - ४०० ००१. | | | |

सदर परीक्षेसाठी आयोगाकडून विहित केलेले अर्जच विचारात घेण्यात येतील. अर्जाच्या झेरॉक्स प्रती किंवा साध्या कागदावरील अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**४.२ उमेदवाराने पूर्ण भरलेले अर्ज आयोगाकडे पोस्ट खात्यामार्फत सादर करावेत. त्याच वेळी आयोगास अर्ज सादर केल्याचे आपल्या विभाग/कार्यालय प्रमुखांना कळवून अर्ज विचारात घेण्यास कोणताही आक्षेप असल्यास अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकापासून ३० दिवसांचे आत आयोगास परस्पर कळविण्याची विनंती करावी. अर्ज विचारात घेण्यास हरकत नसल्यास आयोगास तसे कळविण्याची आवश्यकता नाही.**

**५. पूर्व परीक्षा खालील सात केंद्रांवर घेण्यात येईल.**

| परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक |
|---|---|
| अमरावती | १४ |
| औरंगाबाद | १५ |
| मुंबई | ३० |
| नागपूर | ३२ |

| परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक |
|---|---|
| नांदेड | ३३ |
| नाशिक | ३५ |
| पुणे | ३८ |

**६. परीक्षा शुल्क :-** पूर्व परीक्षेचे शुल्क रुपये **३००/- (रुपये १५०/- मागासवर्गीयांसाठी)** उमेदवारांनी परिपूर्ण भरलेल्या अर्जासोबत टपाल कार्यालयात रोखीने भरणे आवश्यक आहे. ते इतर कोणत्याही स्वरुपात स्वीकारले जाणार नाही. विहित परीक्षा शुल्क रोखीने टपाल कार्यालयात भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

**एकदा भरलेले परीक्षा शुल्क कोणत्याही कारणास्तव परत केले जाणार नाही.**

**७. सदोष अर्ज :-** माहितीपुस्तिकेतील परिच्छेद क्र. ७.३ मध्ये नमूद केलेल्या कारणास्तव सदोष असलेले अर्ज नाकारले जातील/उमेदवारी रद्द करण्यात येईल व त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

**८. परीक्षेस प्रवेश :-** अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे ते परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची पूर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून त्यांना तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु परीक्षेपूर्वी अथवा परीक्षेनंतर कोणत्याही टप्प्यावर, उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पूर्तता करीत नसल्याचे आयोगास आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल आणि त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

**९. प्रवेशप्रमाणपत्र :-** उमेदवारांना परीक्षेस प्रवेश दिल्याबाबतची प्रवेशप्रमाणपत्रे आयोगाकडून परस्पर टपालाद्वारे रवाना करण्यात येतील. प्रवेशप्रमाणपत्रे रवाना केल्याबाबत शासन परिपत्रकामार्फत उमेदवारांच्या निदर्शनास आणून देण्यात येईल. त्याचप्रमाणेआयोगाच्या वेबसाईटवरही घोषणा प्रसिध्द करण्यात येईल. प्रवेशप्रमाणपत्र दाखविल्याशिवाय उमेदवारास परीक्षेस बसू दिले जाणार नाही.

**१०. आयोगातर्फे घेण्यात येणा-या स्पर्धा परीक्षांपैकी ज्या परीक्षा वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरुपाच्या (Objective Type Multiple Choice) प्रश्नपत्रिका असतील त्यासाठी आयोगाने निगेटिव्ह गुणांची (Negative Marking) पध्दत लागू करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यामुळे उमेदवाराने वस्तुनिष्ठ स्वरुपाच्या प्रश्नांची अचुक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावी. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील.**

**११. उमेदवारांना इशारा :-** अर्जात हेतुपुरस्सर खोटी माहिती देणे किंवा खरी माहिती दडवून ठेवणे किंवा त्यात बदल करणे किंवा दाखल्याच्या प्रतीतील नोंदीत अनधिकृतपणे खाडाखोड करणे किंवा खाडाखोड केलेले वा बनावट दाखले सादर करणे, आयोगाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन न करणे, परीक्षा कक्षातील गैरवर्तन, परीक्षेच्या वेळी नक्कल करणे, वशिला लावण्याचा प्रयत्न करणे यासारखे अथवा परीक्षा कक्षाच्या बाहेर अथवा परीक्षेनंतरही तसेच अन्य कोणतेही गैरप्रकार करणा-या उमेदवारांना गुण कमी करणे, विशिष्ट किंवा सर्व परीक्षांना वा निवडींना अनर्ह ठरविणे, काळया यादीत समाविष्ट करणे व प्रतिरोधीत करणे (DEBAR) यापैकी प्रकरणपरत्वे योग्य त्या शिक्षा करण्याचा तसेच प्रचलित कायदा व नियमाच्या अनुषंगाने योग्य ती कारवाई करण्याचे अधिकार आयोगाला असतील. यासंदर्भात शिस्तभंगाची कार्यवाही करण्याचे अधिकार त्यांच्या विभाग/ कार्यालय प्रमुखास असतील. तसेच त्याला विभाग

प्रमुखाकडून/शासनाकडून शासकीय सेवेतून बडतर्फ केले जाण्याची शक्यता आहे. विहित केलेल्या अर्हतेच्या अटी पूर्ण न करणारा उमेदवार कोणत्याही टप्प्यावर निवड होण्यास अपात्र ठरेल आणि/किंवा इतर योग्य अशा शिक्षेला पात्र ठरेल.

**१२. परीक्षेतील गैरप्रकार करणा-यांना इशारा :-** आयोगातर्फे घेण्यात येणा-या परीक्षेत अथवा परीक्षेनंतरही कोणत्याही प्रकारचा गैरप्रकार करणे जसे प्रश्नपत्रिका फोडणे, बनावट प्रश्नपत्रिकांची विक्री करणे अथवा परीक्षेत अनधिकृत साहित्याआधारे नक्कल करणे, दुस-या उमेदवारांकडून मदत घेणे, दुस-या उमेदवारास मदत करणे अथवा कोणत्याही प्रकारे आपली ओळख पटेल अशी कृती करणे, वा तसा प्रयत्न करणा-या उमेदवारांवर तसेच उमेदवार नसलेल्या पण गैरप्रकार करणा-या व्यक्तीवर **"महाराष्ट्र प्रिव्हेन्शन ऑफ मालप्रॅक्टीसेस ॲट युनिव्हर्सिटी, बोर्ड ॲन्ड अदर स्पेसिफाईड एक्झामिनेशन्स ॲक्ट, १९८२"** खाली तसेच प्रचलित कायदा व नियमानुसार कारवाई करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त संबंधित उमेदवारास सदर परीक्षेसाठी अथवा आयोगामार्फत घेण्यात येणा-या सर्व परीक्षा वा निवडीसाठी कायमस्वरुपी प्रतिरोधित (Debar) सुध्दा करण्यात येईल, याचीही उमेदवारांनी नोंद घ्यावी. तसेच त्याला विभाग प्रमुखाकडून/शासनाकडून शासकीय सेवेतून बडतर्फ केले जाण्याची शक्यता आहे.

**१३. पूर्व परीक्षा प्रश्नपत्रिका (२०० गुण ):-**

**१३.१** परीक्षेसाठी **'वस्तुनिष्ठ बहुपर्यायी'** स्वरुपाची फक्त एकच प्रश्नपत्रिका असून, ती **पुस्तकांशिवाय** सोडविणे आवश्यक असेल. प्रश्नपत्रिकेचा तपशील पुढीलप्रमाणे असून, अभ्यासक्रम **परिशिष्ट -ब** मध्ये नमूद केल्याप्रमाणे असेल.

| विषय | गुण | माध्यम | दर्जा | कालावधी | परीक्षेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मराठी | ५० | मराठी | शालांत | दोन तास | वस्तुनिष्ठ पुस्तकांशिवाय |
| इंग्रजी | ५० | इंग्रजी | शालांत | | |
| सामान्य अध्ययन | १०० | मराठी व इंग्रजी | शालांत, मात्र सामान्य अध्ययन मधील घटक क्र.६ व ७ करिता पोलीस दलामध्ये काम करण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान | | |

**१३.२ पूर्व परीक्षा ही मुख्य परीक्षेकरिता उमेदवारांची संख्या मर्यादीत करण्याच्या दृष्टीने घेण्यात येत असल्याने, पूर्व परीक्षेचे गुण अंतिम निवडीच्या वेळी विचारात घेतले जात नाहीत वा उमेदवारांना कळविले जात नाहीत. तसेच मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र न ठरलेल्या उमेदवारांच्या उत्तरपत्रिकांची फेरतपासणी केली जात नाही अथवा यासंदर्भातील कोणत्याही अभिवेदनांवर कार्यवाही केली जात नाही.**

**१४.** आयोगाचे अध्यक्ष, सदस्य किंवा अधिकारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दडपण आणण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अशा उमेदवारास आयोगाच्या निवडीपासून अपात्र ठरविण्यात येईल.

**१५.** प्रस्तुत परीक्षेचा अभ्यासक्रम परीक्षा योजना व अन्य माहिती अर्जासोबत पुरविलेल्या माहितीपुस्तिकेत नमूद केली आहे. तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट - ब मध्ये अभ्यासक्रमाचा तपशील दर्शविलेला आहे.

******

# परिशिष्ट - ब

## पूर्व परीक्षेचा अभ्यासक्रम

पूर्व परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेमध्ये **'मराठी, इंग्रजी, सामान्य अध्ययन'** या तीन विषयांचा समावेश असून त्यांचा अभ्यासक्रम पुढे नमूद केल्याप्रमाणे असेल.

**मराठी व इंग्रजी :-** सर्वसामान्य शब्दसंग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाक्प्रचार यांचा अर्थ व उपयोग तसेच उताऱ्यावरील प्रश्नांची उत्तरे. **(प्रत्येकी ५० गुण)**

**सामान्य अध्ययन :-** **( १०० गुण )**

**(१)** आधुनिक भारताचा इतिहास.

**(२)** भारताचा विशेषतः महाराष्ट्राचा भूगोल.

**(३)** भारतीय अर्थव्यवस्था - जागतिकीकरण, उदारीकरण, खाजगीकरण यांच्या विशेष अभ्यासासह.

**(४)** ग्राम-प्रशासन, जिल्हा-प्रशासन, राज्य-प्रशासनः- रचना, संघटन, कार्ये.

**(५)** महाराष्ट्रातील समाजसुधारक :- महात्मा ज्योतिबा फुले, गोपाळ गणेश आगरकर, छत्रपती शाहू महाराज, डॉ.बाबासाहेब आंबेडकर,महर्षि धोंडो केशव कर्वे, संत तुकडोजी महाराज.

**(६)** गुन्हे अन्वेषणासाठी सहाय्यभूत ठरणाऱ्या वैज्ञानिक पध्दती/साधने (Scientific Aids to Crime Investigation):- संगणक तसेच अन्य आधुनिक साधनांच्या विशेष अभ्यासासह.

**(७)** न्यायसहायक विज्ञान व न्यायवैद्यकशास्त्र (Forensic Science & Forensic Medicine)

**(A)** **Forensic Science :-**

- **(i)** Physical evidence : nature, search, handling, packing and forwarding.
- **(ii)** Finger prints & Foot prints: Importance, finding them on scene of crime, their development and recording.
- **(iii)** Explosives:- its names, commonly used explosives, home bombs, Handling and collection of explosive residues and their examination.

**(B)** **Forensic Medicines :-**

- **(i)** Introduction:- Scope & importance to police. Examination of scene of occurrence from the point of view of medico-legal evidence.
- **(ii)** Medico Legal definition of death, difference between dead & alive persons.
- **(iii)** Identity of dead persons, Post Mortem.
- **(iv)** Violent Asphyxial death - hanging, Suffocation & drowning.
- **(v)** Medico legal aspects of different type of wounds, by fire-arms, sharp edged or pointed weapons.
- **(vi)** Sexual offences - rape.
- **(vii)** Poison commonly used in India in the commission of crime.

**(८)** भारताचे शेजारील राष्ट्रांशी असलेले संबंध.

**(९)** चालू घडामोडी.

********